राज्यातील कृषि विद्यापीठांतर्गत "ड" दर्जाप्राप्त महाविद्यालयांची तपासणी करण्यासाठी समिती गठित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन,**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : मकृप-१०२१.क्र.प्र/१८४/७ अे,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०३ फेब्रुवारी, २०२२.

संदर्भ -: १) मा.राज्यपाल यांच्या अध्यक्षतेखाली संपन्न झालेली दि.१६.११.२०२१ रोजीची बैठक.
२) महाराष्ट्र कृषी शिक्षण व संशोधन परिषद कार्यालयाचे पत्र क्र.मकृप/शिक्षण-१/ प्र.क्र.४०२१/२४४७/२०२१, दि.०६.१२.२०२१.

प्रस्तावना :-

राज्यातील कृषि विद्यापीठांतर्गत खाजगी कायमविना अनुदानित कृषि आणि संलग्न महाविद्यालये सुरु करण्यास परवानगी देणेसंबंधित तसेच दि.१० जुलै, २०१७ रोजी राजभवन, मुंबई येथे मा.राज्यपाल महोदयांच्या अध्यक्षतेखाली चारही कृषि विद्यापीठांच्या कुलगुरु आणि कृषि परिषदेचे उपाध्यक्ष आणि महासंचालक यांच्या सोबत संपन्न झालेल्या बैठकीमध्ये दिलेल्या सूचनांच्या अनुषंगाने करण्यात आलेल्या कार्यवाहीबाबत मा.राज्यपाल महोदयांच्या अध्यक्षतेखाली दि.१६ नोव्हेंबर, २०२१ रोजी बैठक संपन्न झाली. या बैठकीत देण्यात आलेल्या निर्देशानुसार डॉ.एस.एन.पुरी, माजी कुलगुरु, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांच्या अध्यक्षतेखालील गठीत समितीने केलेल्या तपासणीत आढळून आलेल्या "ड" दर्जाप्राप्त महाविद्यालयांची सद्यस्थितीनुसार पुर्नतपासणी करण्यासाठी समिती गठीत करण्याबाबतचा प्रस्ताव कृषि परिषदेने संदर्भ क्र. २ अन्वये शासनास सादर केला आहे. त्यानुषंगाने कार्यवाही करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्यातील चारही कृषि विद्यापीठांची वर्गवारी ठरविण्यासाठी नेमण्यात आलेल्या डॉ.एस.एन.पुरी, माजी कुलगुरु, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांच्या अध्यक्षतेखालील गठीत समितीने केलेल्या तपासणीत आढळून आलेल्या "ड" दर्जाप्राप्त महाविद्यालयांची सद्यस्थितीनुसार पुर्नतपासणी करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र | नाव | पदनाम |
|---|---|---|
| १ | संबंधित जिल्ह्याचा जिल्हाधिकारी / अतिरिक्त जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २ | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी / वरिष्ठ उपमुख्य कार्यकारी अधिकारी | सदस्य |
| ३ | संबंधित जिल्ह्याचा जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी | सदस्य |
| ४ | इतर विद्यापीठांचे मा.कुलगुरु यांनी नामनिर्देशित केलेले सहयोगी अधिष्ठाता | सदस्य |
| ५ | संबंधित विद्यापीठाचे मा.कुलगुरु यांनी नामनिर्देशित केलेले सहयोगी अधिष्ठाता | सदस्य सचिव व समन्वयक |

याबाबतच्या अटी व शर्ती पुढीलप्रमाणे आहेत.

१) राज्यातील प्रत्येक जिल्ह्यासाठी स्वतंत्र समिती असेल.

२) सदर समितीने आपला अहवाल समिती गठित झाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत संबंधित विद्यापीठास सादर करावा.

३) प्रत्येक विद्यापीठाने त्यांच्याकडे प्राप्त झालेल्या त्यांच्या कार्यकक्षेतील सर्व समित्यांचे एकत्रित अहवाल महाराष्ट्र कृषी शिक्षण व संशोधन परिषद पुणे, यांना सादर करावा.

४) समिती कामकाजासाठी लागणारा किंवा आवश्यक असणारा खर्च हा संबंधित विद्यापीठ महसुलातून भागविण्यात यावा.

५) या शासन निर्णयाच्या दिनांकापासून सदर समिती गठित होईल .

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२०३१६३१४२६१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Balasaheb Kisan Raskar

Digitally signed by Balasaheb Kisan Raskar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=aaa93f4d4e49359ddfdb4a9eb4176d16d9032454ac5c700ad6e2a7ad0b3115db, pseudonym=5EAA59C86FCC105FE11B11B0E29C44034464028D, serialNumber=2CF78D68CEEAC33CA63C8A2F2B360EBF1C6AC77C6A1AD4C5BFB24951806AF0A8, cn=Balasaheb Kisan Raskar
Date: 2022.02.03 16:32:42 +05'30'

**( बा.कि.रासकर )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा.मंत्री (कृषि), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५) मा.राज्यमंत्री (कृषि), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६) मा.मुख्य सचिव यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
७) सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
८) सचिव (पदुम) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
९) मा.विरोधी पक्ष नेता, विधान सभा, विधानभवन, मुंबई,
१०) मा.विरोधी पक्ष नेता, विधान परिषद, विधानभवन, मुंबई,
११) सदस्य सचिव तथा महासंचालक, महाराष्ट्र कृषी शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,
१२) सर्व जिल्हाधिकारी, महाराष्ट्र राज्य,
१३) कुलगुरु / कुलसचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जि. अहमदनगर,
१४) कुलगुरु / कुलसचिव, डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला,
१५) कुलगुरु / कुलसचिव, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी,
१६) कुलगुरु / कुलसचिव, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली,
१७) डॉ. एस.एन.पुरी, माजी कुलगुरु, मफुकृवि, राहुरी व मध्यवर्ती कृषि विद्यापीठ, इंफाळ, पुरी निवास, घर नं. ६५०, वार्ड नं.१३, मोवाड, ता. नरखेड, जि. नागपूर.
१८) कार्यासन (७ अे) निवडनस्ती.